# अर्धांगी.....कविता विशेषांक

संपादिका – अलका असेरकर
मीना त्रिवेदी



***Happy Women's Day to all..........***



संपादकीय

'अर्धांगी' या फेसबुक वरील ग्रुप  प्रोफाईलचा, ८ मार्च या महिला दिनानिमित्ताने हा एक छोटासा विशेषांक ..अर्धांगी वरील काही सदस्यांच्या स्त्री जाणीवा व्यक्त करणाऱ्या कविता यात घेतल्या आहेत..'अर्धांगी' ही स्त्रीवादी जाणीवा व्यक्त करणारी, समाजात असलेले स्त्रियांचे दुय्यम स्थान आणि त्याचे दुष्परिणाम यावर मनातले बोलण्याकरिता उघडलेली फेसबुकवरची पहिली मराठी ग्रुप प्रोफाईल. हे आता फेसबुकवरील बहुसंख्य मराठी मित्र-मैत्रिणींना माहित झालेले आहे प्रोफाईल प्रत्यक्ष कृती कार्यक्रमांशी निगडीत नाही..काही छोटे छोटे कार्यक्रम घेतले जातही असले, तरी सोशल नेटवर्कींग साईट्सला केवळ मनोरंजनाचे माध्यम न समजता समाजविचारांचे माध्यमही समजून, विचारांचा प्रसार करणे हाच मुख्य हेतू आहे... 'अर्धांगी' तर्फे प्रसिद्ध झालेला, स्त्री जाणीवांच्या दृष्टीकोनातून विविध प्रकारच्या लेखन साहित्याने भरगच्च असा प्रसिध्द केलेला पहिला विशेषांक बहुसंख्येने वाचला गेला.

या अंकात सुप्रसिद्ध उर्दू शायर आणि गीतकार श्री. कैफी आजमी यांची सुप्रसिद्ध उर्दू  कविता 'औरत' (जी त्यांनी आपल्या मुलीकरिता म्हणजेच शबाना आझमी करिता लिहिली होती)चा आपली सिद्धहस्त कवयित्री क्रांती साडेकर हिने केलेला अर्थवाही, सोपा  मराठी अनुवाद वाचकांसमोर ठेवताना विशेष आनंद होतोय. या मुळ आणि अनुवादित अशा दोन्हीं कवितांकडे वाचकांनी विशेष लक्ष द्यावे ही विनंती. तसेच स्त्री-विषयतज्ज्ञ अलका सिंह आणि वंदना खरे यांच्या आशयपूर्ण कविता हे या अंकाचे वैशिष्ट्य आहे.  या अंकातील कवितांच्या रचनामुल्यापेक्षा त्यातील आशय हा अधिक महत्वाचा आहे...त्यामुळे काही सिद्धहस्त कवी-कवयित्री सोडल्यास माझ्या सारख्या नवोदित कवींच्या कवितेत रचनादोष आढळले तर सुजाण वाचकांनी ते समजून घ्यावे अशा अपेक्षेसह हा अंक आपल्या सर्वांसमोर ठेवतेय..वाचून प्रतिक्रिया अपेक्षित आहेत..

(या अंकातील कवींच्या मतांशी संपादिका सहमत असतीलच असे नाही)

"Aurat" by Kaifi Azmi, written for daughter Shabana..औरत

*उठ मेरी जानमेरे साथ ही चलना है तुझे !*

*कल्बज़ंग हैं आज-ए-माहौल में लरज़ाँ शरर-ए-*
*हौसले वक़्त के और ज़ीस्त के यक रंग हैं आज*
*आबगीनों में तपां वलवलासंग हैं आज-ए-*
*हुस्न और इश्क हम आवाज़ व हमआहंग हैं आज*
*जिसमें जलता हूँ उसी आग में जलना है तुझे*
*उठ मेरी जानमेरे साथ ही चलना है तुझे !*

*ज़िन्दगी जहद में है सब्र के काबू में नहीं*
*नब्ज़हस्ती का लहू कांपते आँसू में नहीं-ए-*
*उड़ने खुलने में है नक़्हत ख़मगेसू में नहीं-ए-*
*ज़न्नत इक और है जो मर्द के पहलू में नहीं*
*उसकी आज़ाद रविश पर भी मचलना है तुझे*
*उठ मेरी जानमेरे साथ ही चलना है तुझे !*

गोशेगोशे में सुलगती है चिता तेरे लिये-
फ़र्ज़ का भेस बदलती है क़ज़ा तेरे लिये
क़हर है तेरी हर इक नर्म अदा तेरे लिये
ज़हर ही ज़हर है दुनिया की हवा तेरे लिये
रुत बदल डाल अगर फूलना फलना है तुझे
***उठ मेरी जानतुझ मेरे साथ ही चलना है !***

क़द्र अब तक तिरी तारीख़ ने जानी ही नहीं
तुझ में शोले भी हैं बस अश्कफ़िशानी ही नहीं
तू हक़ीक़त भी है दिलचस्प कहानी ही नहीं
तेरी हस्ती भी है इक चीज़ जवानी ही नहीं
अपनी तारीख़ का उनवान बदलना है तुझे
उठ मेरी जानमेरे साथ ही चलना है तुझे !

तोड़ कर रस्म के बुत बन्दक़दामत से निकल-ए-
ज़ोफ़नज़ाकत से निकल-ए-इशरत से निकल वहम-ए-
नफ़स के खींचे हुये हल्क़ाअज़मत से निकल-ए-
क़ैद बन जाये मुहब्बत तो मुहब्बत से निकल
राह का ख़ार ही क्या गुल भी कुचलना है तुझे
उठ मेरी जानमेरे साथ ही चलना है तुझे !

तोड़ ये अज़्म शिकन दग़दग़ापन्द भी तोड़-ए-
तेरी ख़ातिर है जो ज़ंजीर वह सौगंध भी तोड़
तौक़ यह भी है ज़मर्रूद का गुल बन्द भी तोड़तोड़
पैमाना-ए-मरदान-ए-ख़िरदमन्द भी तोड़
बन के तूफ़ान छलकना है उबलना है तुझे
उठ मेरी जानमेरे साथ ही चलना है तुझे !

तू फ़लातून व अरस्तू है तू ज़ोहरा परवीन
तेरे क़ब्ज़े में ग़रदूँ तेरी ठोकर में ज़मींहाँ
उठा जल्द उठा पामुक़द्दर से ज़बीं-ए-
मैं भी रुकने का नहीं वक़्त भी रुकने का नहीं
लड़खड़ाएगी कहाँ तक कि संभलना है तुझे
उठ मेरी जान!मेरे साथ ही चलना है तुझे !

**क्रांती साडेकर यांनी केलेला औरत या कवितेचा मराठी भावानुवाद**

- ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे
  युद्धाच्या ठिणग्या तडतडती बेचैनीच्या वातावरणी
  आयुष्याच्या अन् काळाच्या आवेशाची एक मागणी
  काचेच्या पेल्यांत आज उल्हास जसा उसळे पाषाणी
  प्रीत आणि सौंदर्य समसमा, आज भिन्न ना त्यांची वाणी
  जळतो ज्या वणव्यात मी, तुला त्यातच धुमसायाचे आहे
  ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

सामर्थ्याने घडते जीवन, सोशिकतेच्या मुठीत नसते
अस्तित्वाचे रुधिराभिसरण थरथरत्या अश्रूंतुन नसते
गंधित झुळुक न बटांमध्ये, ती स्वच्छंदे उडण्यातच असते
स्वर्ग न केवळ नरचरणांशी-, अनंत त्याची व्याप्ती असते
त्या स्वतंत्र, उत्फुल्ल गतीवर तुलाहि लहरायाचे आहे
ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

मोल तुझे ना जाणुन घेता आले अजुनी इतिहासाला
तुझ्यापास ना अश्रू केवळ, तू असशी तेजाची ज्वाला
वास्तव तू, ना कपोलकल्पित कथा जिवाला रंजविण्याला
तारुण्याहुन भिन्न, विवक्षित व्याप्ती तुझिया अस्तित्वाला
तुला तुझ्या इतिहासाचेही शीर्षक बदलायाचे आहे
ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

कोन्याकोन्यामध्ये भडकल्या चिता या इथे तुझ्याचसाठी
कर्तव्याच्या वेषामध्ये मरण थांबते तुझ्याचसाठी
तुझे तरल, नाजूक वागणे संकट ठरते तुझ्याचसाठी
हलाहलाच्या रुपात इथली हवा वाहते तुझ्याचसाठी
बदल ऋतू हा तुला इथे जर फुलून बहरायाचे आहे
ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

पुतळे विध्वंसून रुढींचे जुन्या रिवाजांतून मुक्त हो
सौख्य बेगडी, नाजुकतेच्या भ्रामक पाशांतून मुक्त हो
महानतेच्या मनानेच आखल्या वर्तुळातून मुक्त हो
कारावास ठरेल प्रेम तर तू त्या प्रेमातून मुक्त हो
वाटेतिल काटाच काय, पण फूलहि तुडवायाचे आहे
ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

तुझ्या निश्चया विरोध करतो, त्या सल्ल्याला धुडकावुन दे
शपथा, ज्या होतात शृंखला, खुशाल मोडुन झिडकारुन दे
रत्नजडित गळसरी गळ्याचा फास, तोड तो अन् टाकुन दे
पुरुषप्रधान बुद्धिचा प्याला तोडुन फोडुन भिरकावुन दे
वादळ होउन गरजत बरसत तुलाहि उसळायाचे आहे
ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

तत्वज्ञान तुझ्यात, आणि तू नक्षत्रांच्या रुपात वसशी
मुठीत घेउन आकाशाला पायदळी धरणीस तुडविशी
उचल नियतिच्या चरणांवरचे अगतिक मस्तक झटक्यासरशी
थांबणार ना मीहि इथे अन् कालगती का थांबते अशी?
किती काळ गडबडून जाशिल? तुला सावरायाचे आहे
ऊठ लाडके, तुलाहि माझ्यासोबत चालायाचे आहे

मूळ रचना औरत :
रचनाकार क़ैफ़ी आज़मी :
स्वैर भावानुवाद क्रांति :



## "या अनोख्या वळणावर..."

वाटलं होतं मी तर एकटीच निघालेय
माझा स्वत..चा रस्ता आखून घेत:
पण अचानक एका अनोख्या वळणावर तू भेटलीस...
मैत्रिणच मिळाली सोबतीला...
तुझ्या चिमुकल्या हाताच्या आधाराने चालता चालता
कधी तुला माझ्या वेगाबरोबर खेचता खेचता,
कधी तुला रस्त्यावरच्या गमती दाखवता दाखवता,
हळूहळू लक्षात येत गेलं की
आपले रस्ते आता निराळे व्हायला लागलेत...
माझा रस्ता उतरणीचा
तुझा रस्ता उभारीचा
या अनोख्या वळणावर ...
उमेदीने नव्या रस्त्यावर चालणाऱ्या
तुझ्या आकृतीकडे मी कौतुकाने पाहतेय...
कधीकाळी अशाच उत्साहाने
एक रस्ता चढून पार केला होता मीही...
म्हणूनच या अनोख्या वळणावर...
आज माझ्यासमोर एक प्रश्न उभा...

तुझ्या नव्या रस्त्यावरचे खाचखळगे,अवघड वळणं;
सारंकाही एकदा बोट धरून दाखवून द्यावं का तुला?
की
प्रत्येकीला आपला रस्ता आपणच
आखून घ्यावा लागतो हे उमजून
स्वतचा रस्ता आखून घेत:
पुन्हा निघावं एकटीनेच???

वंदना खरे-



तुम फिर मुझे उसी भट्ठी में डालना चाहते हो
जहां से तपकर मैं निकली थी
उसी कब्र में दफन करने को आतुर हो
जहां से मैं उड चली थी

मैं जब भी कुछ पन्ने तलाश
उसपर स्त्री लिखती हूं
तुम सब मिलकर उसे
रद्दी की टोकरी में डाल देते हो
और जब भी अधिकार लिखती हूं
उसे टुकडों में बांट बेमानी करने लगते हो

देख रही हूं
तुम्हारे पन्ने पर स्त्री होने का मतलब
एक संकीर्ण वक्तव्य
मां, ममता और माया

इन परिभाषाओं से निकल
अब लिखने लगी हूं 'स्त्री'
समझने लगी हूं स्त्री
और गढने लगी हूं स्त्री

इस नये संकल्प में
भट्ठियां अब
उर्जा बन गयी हैं
और कब्रें

नसीहतों का भण्डार ...........................अलका सिंह 

# आई मला मार गं....

गर्भात तुझ्या मी अंकुरतेय होईल तुला भार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

चाचणी नंतर कळेल जेंव्हा मुलगी आहे म्हणून
कूस तुझी चांगली नाही बाबा म्हणतील कण्हून
ताई झाल्या वेळीचा तू आठव जरा थरार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

टिटवी ओरडेल कुत्री रडतील सारे होईल अमंगल
चाहूल माझी घेवून येईल नैराश्याचं जंगल
मला नाही व्हायचं कधी अनाहूत नार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

लग्नानंतर बदलतंय नाव गोत्र अन कुलदैवत
हरवून जातोय आपला सूर लावू कसा धैवत ?
अपेक्षा अन वास्तव यात खूप खूप दरार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

अन इनव्हायटेड चालेल कदाचित पण अन वांटेड नसावं
मी तर आई दोन्ही आहे जगात कोठे बसावं ?

तुझ्या सारखा नकोय मला अंधारशी करार गं
लिंग निदान चाचणी अधीच आई मला मार गं

मला नाही मरायचंय नणंद दीरा कडून
मरण नकोय मला कधी सासूसास-या कडून-
जळून मेल्या नंतर तुझ्या डोळ्याला लागेल धार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

फ्रीझ, पंखा, टीव्ही, स्त्री हेच जगाचं माप गं
आदिमाया, आदिशक्ती लोणकढी थाप गं
या जगातून जन्मा पूर्वीच होऊ दे फरार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

दूर दिसतोय आशा किरण मंद स्मीत ओठी
वेळ खूपय कदाचित तुझ्या पणतीच्या पोटी
बिजली म्हणून जन्मेन मी करण्याला प्रहार गं
लिंग निदान चाचणी आधीच आई मला मार गं

निशिकांत देशपांडे मो९९०२३ ९८९०७ .नं.



E Mail :- nishides1944@yahoo.com

# "हिंदू तालीबान"

नारी हीच देवी /नारी हीच ओवी
विश्वाला पालवी/ नव्हाळीची// १//
नारी स्वातंत्र्याने /राष्ट्र झळाळते
जेंव्हा खळाळते/  हास्य तिचे// २//
नारी हेच" रत्न /"संस्कृती" कोंदण"
कर्मठा आंदण /दिल्हे नसे// ३//
नारीचे स्वातंत्र्य /मूल्य उच्चतम
नेणती अधम / जगामाजी// ४//
नारी पारतंत्री /नाही तुम्हीही स्वतंत्र
धर्म-षडयंत्र /वोळखावे// ५//
सांभाळा मित्रांनो आज /सरे" हिंदुस्तान"
"अप" "घाणी "स्तान /अवतरे// ६//
जरा जीन्स घाली /पोर ती निष्पाप
यांच्या मनी पाप /खदखदे// ७//
मनासी लागली / मोठी यांच्या कीड
फेकती आसीड /तिच्यावरी// ८//
गर्भीच खुडल्या /एक कोटी कळ्या
दाम्भिकाना लळा /मुळी नाही// ९//
हुंड्याच्या हावेने / जाळताती सुना
जरा यांच्या मना/ लाज नाही//१०//

एकटी ती पोर /नजरेला पडे
सत्रा ते हिजडे /घसरले//११//
प्रेमी-प्रेमिकांना/ ठारही मारिती
कर्मठाच्या चित्ती /नाही देव// १२//
येताजाता सांगे /संस्कृतीच्या बाता
xxवर लाथा /हाणा चार//१३//
"मिलिंद "म्हणे ऐसे"/हिंदू" "तालीबान"
यांच्या माथी घण /आहे माझा// १४//

: मिलिंद पदकी



०८/०९/ २०१२

## - आम्ही सावित्रीच्या मुली -शशी डंभारे

आम्ही सावित्रीच्या मुली ....
सारी क्षितिजे आम्हा खुली ...
ऊन वा याची-, अंधकाराची भीती आम्ही सोडली
नव्या युगाच्या सूर्य बियांनी भरल्या या ओंजळी
आम्ही सावित्रीच्या मुली ....
सारी क्षितिजे आम्हा खुली ...

तप्त भूमीवर रक्त शिम्पतो
अनवाणी नांगरतो
माथ्यावरती सूर्य पेलवत
बिज बिज पेरतो ....
सुसाट वारा ,झर झर धारा
अंगावर झेलतो
बीजतो रुजतो माती मधुनी
गर्भ नवा जागवतो .... मेहनत कष्ट
जगतो स्पष्ट .........लाचारीला फूली ....
आम्ही सावित्रीच्या मुली ....
सारी क्षितिजे आम्हा खुली ...
शाळेत जातो शिकतो शिकवतो
पंचायत चालवतो बचत गटातुन जमतो-जमवतो

गणित नफ्याचे खेळतो
विज्ञानावर ठसा आमचा
संजीवन देतो
घरच नाही ..देश चालवतो
संसद गाजवतो .... शोध प्रबंध
कायदा दंड ...........सारी क्षेत्र व्यापली .....
आम्ही सावित्रीच्या मुली ....
सारी क्षितिजे आम्हा खुली ...
चौखूर उधळत स्वप्न वारु
मस्त आम्ही चाललो ..
क्षितिजा बाहेर , अन्तराळी ही
पावूल ठेवून आलो
विद्यावंत ....आम्ही प्रद्यावंत
सृजन आमचे नाव
कला प्रेमी आणि कलावंतही
वसवू हवे ते गाव .................ही बेधुन्दी
विजयी नांदी .............. या युगाने नोंदली .....
आम्ही सावित्रीच्या मुली ....
सारी क्षितिजे आम्हा खुली ...
ऊन वा-याची , अंधकाराची भीती आम्ही सोडली.. नव्या
युगाच्या सूर्य बियांनी भरल्या या ओंजळी

आम्हीसावित्रीच्यामुली ..सारी क्षितिजे आम्हा खुली..



# महिला दिन

आज फिर वो
कागज कि कश्ती
मासूमियत से दोस्ती

हराभरासा आंगन
खिलाखिलासा मन
वो कोयल की कूक
पेट काटती भूख

दहलीजपें माँ
आखोमें सुरमा
अन्जाने का आना
मा का सिमटना

वो अत्तर का सुगंध
रात का चमकना
सुबह होते हि
मा का बिखरना

बौखलाया सा बिछाना
एक कोने मे बैठा मै
किसी प्यासे का नमुना
रेडिओ कि आवाज
महिला दिन की गाज

- विशाखासमीर

# अग्निपरीक्षा

कुठे जानकीस द्यावी लागे
अजुनी अग्निपरीक्षा
कुठे स्मरणात लक्ष्मणाच्या
उर्मिलेस उपेक्षा

कुठे उद्धरण्या शिळेपासुनी
अहिल्येस प्रतिक्षा
कुठे द्रौपदी करते धावा
लज्जेची मागत भिक्षा

काळ बदलला परि त्याच त्या
स्त्रीच्या फोल अपेक्षा
कधी राम तर कधी मुरारी
येऊन करतील रक्षा

जाग मानसी जाग जरा
नकोस भोगू शिक्षा
पसर पंख अन घे भरारी
विस्तार स्वतःच्या कक्षा



-वनिता तेंडुलकर-बिवलकर
सिंगापूर

## स्त्रीमुक्ती-

स्त्रीला मुक्त करा
स्त्रीला मुक्त करा
अरे पण कशापासून ?
कोणापासून ?
तिने तिच्या डोळ्यावर बांधलेल्या
मानसिक गुलामगिरीच्या झापडापासून ?
की, वर्षानुवर्षे ,शतकानुशतकाने वाहिलेल्या
रूढी ,परंपरांच्या जड ओझ्यातून ?
घ्यायचाय तिला ही मोकळा श्वास
मिळालं जरी आहे तिला
शैक्षणिक स्वातंत्र्य
कमावलंय तिने जरी आर्थिक स्वातंत्र्य
शिकलय तिने जरी तिने
नवीन युगाचे तंत्र
आधुनिक कपड्यांनी सजली आहे
जरी ती नखशिखांत
तरी आहे का ती
मनानी खरच स्वतंत्र ?

-मनिषा सिलम... 

## कात.

झाड्यांच्या पायथ्याशी
पाचोळ्यांची पाल
जुनाट खपली खोडांची
आणि सोडते साल

पानगळीच्या हंगामाने
रान मोकळे झाले
अखेर लाजाळूचे झाड
तेही नागळे झाले

वैशाखी वणव्यात
जळून जाते जुने
आदिमासवे मादी
नवे नोंदते गुन्हे.

-प्रशांत पनवेलकर, वर्धा..



# सृजा

अंतराळात फिरणाऱ्या मला
आज घरट मिळालंय
तूच पाठवलस ना मला.. म्हणालास..
तू सृजा आहेस..
सृष्टीच सातत्य..
आदिशक्ती...
निरंतरता...
सुंदरता...
वैभव...
तू आहेस म्हणूनच....
मी हरखलेतुझ्या कौतुकाने...निर्धास्तले...आनंदले...
माझी चाहूल लागताच...
माझ्या आईवडलांच्या आनंदाला पारावार राहिला नाही-
साखरेसारखी हि गोड बातमी घरात पसरली
काय काय नवस केले होते माझ्या आजीने
माझ्यासाठी)...?)
मग प्रत्येक दिवसागणिक..
मी आतुर होत गेले
हे जग पाहायला
त्यातल्या सुंदरतेचा अनुभव घ्यायला
झुळझुळणारा वारा...

पावसाच्या धारा...

पानांची हिरवळ...

फुलांचा दरवळ...

दादा,आजी,मामा,मावशी

किती किती नात्यात वेढली जाणार होते मी...

आज.....

घरात माहिती झालय मी सृजा असल्याचं

आता माझ महत्व अजून वाढणार...

कौतुकाचे सोहळे केले जाणार...

मी याच भ्रमात राहिले....

आणि एक दिवस....

नुकताच उगवणारा माझा अंकुर खुडण्यात आला..

माझ्याच घरट्यात माझा गळा घोटण्यात आला..

मी खूप रागावले तुझ्यावर

म्हटले तुला

तुझ्या मर्जीने पाठवलस ना तू मला ?

मग माझ जाणं का सोपवलंस

या क्रूर लोकांच्या हाती?

का...?

का मला या जगात येण्याआधीच संपवण्यात आलं?
कारण मी एक सृजा होते म्हणून...?
तू निशब्द झालास...
समोर पाहत राहिलास...
अंत......
सृष्टीच्या सातत्याचा.....

-योगिता पाटील
yogitapatil610@gmail.com





# सल

लहाणपणीच सुई दोरा दिला हातात आईनं
म्हणाली बाईच्या जातीला ठिगळं लावता आली पाहिजे...
उसवलेलं जोडता यालला पाहिजे...
टाके पण निगुतीनं घालता यायला हवेत..
वरवर पाहिलं तर देखणं दिसलं पाहिजे..
एक टाका वेळीच घालता आला पाहिजे...
म्हटलं दादा ला पण शिकवं ना...
तर बापानं एक थोबाडीत दिली...
तेवढी एक जखम अजून काही शिवता आली नाही...


छाया
chhayathorat12@gmail.com ..




**--- अंतरंग ? ......**

वेलबुट्टी च्या साडीत छान
खुलून दिसतेस सांगून
पत्नीसाठी थोडं स्वतःला बदलशील का ?
तुझ्या हाताने मोगर्याचा गजरा
तिच्या केसात माळशील का?
बेधुंद होऊन तिला खुलवशील का ?
तुझी पत्नी असून ती एक स्त्री आहे
तिच्या भावनांना समजून घेशील का ?
भावना तिच्या अलवार दवबिंदू सारख्या
अलगद त्यांना टिपशील का ?
माहेर सोडून आली तुझ्याकडे
तिचे मन सांभाळून, आहे नाही ते पाह..शील का ?
गहिवरलेली, निराश भासते तेव्हा
धीर देऊन अंतरंग तिचे फुलवशील का ?
शोधू नकोस प्रश्नांची उत्तरं
नवा वसंत फुलवशील का ?
नातं तुझं अनंत काळाचं
आयुष्याच्या सायंकाळ पर्यंतचं
तिच्या पाठी भक्कम राहून



अगदी अखेरच्या श्वासापर्यंत
संसारी वसंत फुलवायचा आहे ...

- कैलास मांडगे

# लौ

मैं एक जलती हुइ लौसे
प्रज्वलित ज्वाला बन रही हुं
मेरी हर पेशिमें त्सुनामीका
प्रचंड प्रवाह प्रवेग फैल रहा है-
आज इन्हीं शब्दोंसे नींद खुली है ..
पर अब ये रोकी भी नही जा सकती ..
और यह मत सोचो तुम बच पाओगे ..
यह उठ रही है..सबको उठा रही है ..

मीना त्रिवेदी-



## तिचं उडणं.

तो आता पुर्वीसारखा मतलबी नाही राहिला
पेशवाईतले दिवस गेले हे त्यालाही माहित आहे आता
आता तो दिवसांतून दोनदा तरी तिला
‘आय लव्ह यू’ म्हणतोच...

एकदा सकाळी टाटा करताना
मग तिला वाटत राहतं
आता त्याच्या मनात दिवसभर मीच फक्त
एकदा रात्री मिठीत घेताना
तेव्हा त्याच्या मनात कोण
ते ब्रम्हदेवालाही कठिण जाईल ओळखणं....

या दोन वाक्यांवर
ती उडत राहते दिवसभर
मनातल्या मनात......
(की घरातल्या घरात....)

आणि या दोन वाक्यांवर तो
खरोखरीचाच उडत राहतो
मन मानेल तिथं मन..मानेल तेव्हा .बिनधास्त...

असं म्हटल्यावर तो म्हणालाच
मी तर तिलाही घेऊन उडायला तयार आहे
पण तिला बाळाला भरवायचं असतं
मग न्हाऊ घालायचं असतं........
मग शाळेत सोडायचं असतं..
मग त्याची परीक्षा असते...
कधी त्याचे आजी आजोबा येणार असतात
सोबत चार पाहुणे असतात
कधी बाळाच्या भल्याकरिता
चार सणवार साजरे करायचे असतात
सर्व करुन कधी संसाराची
आर्थिक ठिगळंही जोडायची असतात.
ही तिची कारणं तिला आयुष्यभर पुरतात

नाहीतर मी तसा पुर्णपणे तिच्या बाजूने आहे
तुम्हीच सांगा यात माझा काय दोष आहे......

मग मी गप्प बसते..
कावळे दादा, कावळे दादा थांब जरा
मी माझ्या बाळाला भरवतेमग दार... उघडते
म्हणणा-या...या चिऊताईची गोष्ट आठवत राहते-

नाही, आता तीही बिचारी उडते थोडी थोडी .., कधी कधी
पण तोपर्यंत तिच्या पंखातलं बळ ओसरलेलं असतं
निळ्याभोर आकाशाचं चित्रही
आताशा डोळ्यावर चष्मा लावूनच तिला बघावं लागतं..

-अलका



# समाप्त